महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी अंतर्गत कृषि संशोधन केंद्र,सावळी विहीर खुर्द,शिर्डी, ता. राहाता, जि. अहमदनगर येथील कृषि विद्यापीठाची जमीन महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि-१४२३/प्र.क्र.८९/७-अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:-३०/०६/२०२३.

**संदर्भ :-** १. महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र.जमीन-०४/२००६/प्र.क्र.३५/ज-१, दि.०८/०९/२००८.

२. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे जा.क्र.मकृप/विशि/१४५९/२०२३, दि.३१/०५/२०२३ रोजीचे पत्र.

३. कुलसचिव,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांचे जा.क्र.का.व्य/जमिन/६५/२०२३, दि.१६.०५.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय भाषणात मा.उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांनी अहमदनगर जिल्ह्यात नवीन पशुवैद्यकीय महाविद्यालय स्थापन करण्याची घोषणा केली आहे. त्यानुषंगाने महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ,नागपूर अंतर्गत अहमदनगर जिल्ह्यात नवीन पशुवैद्यकीय महाविद्यालय स्थापन करण्याचे नियोजीत आहे. सदर नियोजीत पशुवैद्यकीय महाविद्यालयासाठी महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गतची कृषि संशोधन केंद्र,सावळी विहीर खुर्द,शिर्डी,ता.राहाता,जि.अहमदनगर येथील ७५ एकर जमीन हस्तांतरीत करण्याची विनंती पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभागाने केली आहे.त्यानुषंगाने सदर जमीन उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकातील तरतूदीनुसार अहमदनगर येथील नियोजीत पशुवैद्यकीय महाविद्यालयासाठी महसूल व वन विभागाकडे प्रत्यार्प्रित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी अंतर्गतची कृषि संशोधन केंद्र,सावळी विहीर खुर्द, शिर्डी, ता.राहाता,जि.अहमदनगर येथील गट क्र.१०३,गट क्र.७२/१, गट क्र.८८,गट क्र.८९, गट क्र.९०, गट क्र.९१, गट क्र.९२, गट क्र.९७ येथील एकूण क्षेत्र ४९.७० हेक्टर आर. पैकी ३०.३५ हेक्टर.आर (७५ एकर) जमीन महसूल व वन विभागास प्रत्यार्पित करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांना महसूल व वन विभागास वर्ग करावयाच्या ७५ एकर जमिनीपोटी कोणताही मोबदला देय राहणार नाही.

३. कुलसचिव,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांनी कृषि संशोधन केंद्र,सावळी विहीर खुर्द, येथील गट क्र.१०३,गट क्र.७२/१, गट क्र.८८,गट क्र.८९, गट क्र.९०, गट क्र.९१, गट क्र.९२, गट क्र.९७ येथील एकूण क्षेत्र ४९.७० हेक्टर आर. पैकी ३०.३५ हेक्टर.आर (७५ एकर) जमीनीचा प्रत्यक्ष ताबा जिल्हाधिकारी,अहमदनगर यांना अथवा त्यांनी नियुक्त केलेल्या प्राधिकारी/अधिकारी यांचेकडे सोपवावा. सदरहू जमिनीचा ताबा देण्यापुर्वी कुलसचिव,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी यांनी जमीनीचा निश्चित कोणता हिस्सा प्रत्यार्पित करावयाचा आहे, याबाबत जिल्हाधिकारी,अहमदनगर यांच्या सल्ल्याने जमीनीचे आरेखन निश्चित करुन व मोजणी करुन जमीन प्रत्यार्पित करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या अनौ.सं.क्र.०५/ज-६,दि.०९/०६/२०२३ अन्वये दिलेल्या अभिप्रायानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६३०१२५४३४१९०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2024.06.18 15:50:18 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (महसूल,पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विभाग),यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (महसूल),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (कृषि),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. प्रधान सचिव (पदुम),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. जिल्हाधिकारी,अहमदनगर.
८. महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
९. कुलगुरु,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी.
१०.कुलसचिव,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी.
११.सह सचिव (ज-६),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२.महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा व लेखा अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
१३.निवडनस्ती (७-अे).